**विद्यापीठ अनुदान आयोगाने दिनांक ३० जून, २०१० चे अधिसूचनेन्वये शिक्षक व समकक्ष पदावरील नियुक्त्या, सदर पदांचे किमान शैक्षणिक अर्हता, वेतनश्रेण्या, अनुषंगिक लाभ व प्रोत्साहन पर वेतनवाढी इत्यादी बाबीं संदर्भात निर्गमित केलेले निर्देश महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ व घटक महाविद्यालयातील शिक्षक व शिक्षक समकक्ष पदांना लागू करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक मपवि २०१७/प्र.क्र. ३४/म्हापसू**
मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
दिनांक : ०३ फेब्रुवारी, २०२०.

<u>वाचा</u> :- १) केंद्र शासनाच्या मनुष्यबळ विकास मंत्रालयाचे पत्र क्र १-३२/२००६-U-II/U.I(i), दिनाक ३१ डिसेंबर २००८.
२) केंद्र शासनाच्या कृषि मंत्रालयातील कृषि संशोधन व शिक्षण विभागाचे पत्र F No (१)/२००९ per IV, दिनांक १३ मार्च २००९
३) विद्यापीठ अनुदान आयोगाची अधिसूसचना क्र F-३.१/२००९, दि ३० जून २०१०
४) कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, शासन निर्णय क्र मपवि २०१०/ प्र.क्र. ४४८/पदुम- १ (अ), दिनांक १५ जुलै, २०१०.
५) केंद्र शासनाच्या मनुष्यबळ विकास विभागाचे पत्र क्र F. १-७/२०१०-U-II, दिनाक ११ मे २०१०
६) केंद्र शासनाचे राजपत्र दिनाक १८-२४ सप्टेंबर, २०१०
७) केंद्र शासनाच्या कृषि मंत्रालयातील कृषि संशोधन व शिक्षण विभागाचे पत्र क्र F No १(०१)/२००९-PER.IV, दिनाक २/०८/२०१०
८) कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग शासन निर्णय क्र मपवि २०१७/ प्र.क्र. ३४/म्हापसू, दिनाक २७ सप्टेंबर, २०१८.

<u>प्रस्तावना -</u>

विद्यापीठ अनुदान आयोगाने संदर्भाधीन क्र ३ येथील दिनांक ३० जून, २०१० च्या अधिसूचनेन्वये केंद्रीय विद्यापीठे व महाविद्यालय/ संस्थां मधील शिक्षक व शिक्षक समकक्ष पदांवरील नियुक्त्या, सदर पदाची किमान शैक्षणिक अर्हता आणि उच्च शिक्षणामध्ये दर्जा कायम राखण्याकरीता उपाय योजना इत्यादी बाबी निश्चित केलेल्या आहेत. तसेच सदर पदावरील अध्यापकांच्या वेतनश्रेण्या, अनुषंगिक लाभ, प्रोत्साहनपर वेतनवाढी इत्यादी बाबतीतही निर्देश दिलेले आहेत.

२. विद्यापीठ अनुदान आयोगाची उक्त दिनाक ३० जून २०१० ची अधिसूचना केंद्रशासनाच्या दि १८-२४ सप्टेंबर, २०१० च्या राजपत्रात प्रसिध्द झालेली आहे. सदर अधिसूचनेतील बाबी महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ व घटक महाविद्यालयातील शिक्षक व शिक्षक समकक्ष पदांना लागू करण्याचे निर्देश भारतीय कृषि अनुसंधान परिषदेने संदर्भाधीन अनु. क्र ७ येथील दिनांक २/०८/२०१० च्या पत्रान्वये दिलेले आहेत. त्यानुसार महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ व घटक महाविद्यालयातील शिक्षक व शिक्षक समकक्ष पदांना विद्यापीठ अनुदान आयोगाच्या उक्त दिनाक ३० जून २०१० च्या अधिसूचनेतील परिच्छेद क्र. ६.०.४, ११.०, १६.० व १७.० येथील बाबी वगळून इतर बाबी संदर्भाधीन अनु. क्र ८ येथील दिनाक २७ सप्टेंबर, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये लागू करण्यात आलेल्या आहेत.

३. आता, विद्यापीठ अनुदान आयोगाच्या वरील दिनांक ३० जून २०१० च्या अधिसूचनेतील परिच्छेद क्र. ६.०.४, ११.०, १६.० व १७.० बाबी महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ व घटक महाविद्यालयातील शिक्षक व शिक्षक समकक्ष पदांना लागू करण्याचे बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

विद्यापीठ अनुदान आयोगाच्या दि ३० जून, २०१० च्या अधिसूचनेतील वरील बाबींचा साकल्याने विचार करुन या संदर्भात शासन पुढील प्रमाणे आदेश देत आहे :-

| **अ. क्र.** | **विद्यापीठ अनुदान आयोगाच्या दिनाक ३० जून २०१० च्या अधिसूचनेतील परिच्छेद क्रमांक** | **तरतूद** | **शासन आदेश** |
|---|---|---|---|
| १ | **परि क्र ६.०.४** | विद्यापीठ तसेच महाविद्यालयातील शिक्षक संवर्गातील सरळ सेवेच्या भरतीसाठी असलेल्या निवड समितीमध्ये मागासवर्गीयाना प्रतिनिधीत्व देणे. | सदर मुद्यातील सर्व बाबी जशाच्या तशा लागू करण्यात येत आहेत. |
| २ | **परि क्र ११.० (११.१ ते ११.५)** | परिविक्षाधीन कालावधी व स्थायीत्वा बाबत. | सामान्य प्रशासन विभागाने शासकीय अधिकाऱ्यांच्या संदर्भात लागू केलेल्या धोरणाप्रमाणे कार्यवाही करावी. |
| ३ | **परि.क्र. १६ (१६.१ ते १६.३)** | सेवा करार व सेवाजेष्ठता निश्चिती करणेबाबत. | सदर मुद्यातील सर्व बाबी जशाच्या तशा लागू करण्यात येत आहेत. |
| ४ | **परि.क्र. १७ (I ते VII)** | व्यावसायिक नितिमुल्ये संहीता बाबत. | सदर मुद्यातील सर्व बाबी जशाच्या तशा लागू करण्यात येत आहेत. |

२. सदर अधिसूचनेची अंमलबजावणी दि ३० जून २०१० पासून पूर्वलक्षी प्रभावाने करण्यात यावी.

३. विद्यापीठ अनुदान आयोगाच्या दिनाक ३० जून २०१० च्या अधिसूचनेतील परिच्छेद क्र ७.४.० मध्ये दिलेल्या निर्देशानुसार सदरहू शासन निर्णयामधील ज्या ज्या बाबी परिनियमाव्दारे लागू करण्यात येतील असे आदेश दिलेले आहेत, त्या त्या बाबींचा प्रस्ताव महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठाने शासनास त्वरीत सादर करावा.

४. महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ अधिनियम १९९८, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान परिनियम २००२ व सदर शासन निर्णय यांच्या तरतूदीमध्ये काही विसंगती होत असल्यास महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ अधिनियम १९९८ व महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान परिनियम २००२ मधील तरतूदी अंतीम समजण्यात येतील.

५. हे आदेश सामान्य प्रशासन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ३४७/२०१९/११, दिनांक १४/०८/२०१९, अनौपचारीक संदर्भ क्र. ७९२/का १२, दिनांक २२/०७/२०१९ आणि अनौपचारीक संदर्भ क्र. ३४४/१६ब, दिनांक १९/११/२०१९ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यांत येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashta.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०२००२०३१४५७४५९४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

VIKAS TULSHIRAM KADAM

Digitally signed by VIKAS TULSHIRAM KADAM
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=9869ec61c857e78e82b7a19b04c6d22f8ef1b8dbc9b19d45ef776d80ef148059, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=406cb152e109154a7466c0050f88e5a437e17838973824687653a5e8d144b72b, ou=AGRI AND ADF DEPARTMENT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VIKAS TULSHIRAM KADAM
Date: 2020.02.03 14:58:43 +05'30'

**( विकास तु. कदम )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, मुंबई.
४. मा. विरोधी पक्ष नेता, विधान सभा, विधान भवन, मुंबई
५. मा. विरोधी पक्ष नेता, विधान परिषद, विधान भवन, मुंबई
६. आयुक्त, पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. आयुक्त, दुग्धव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई .
८. आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई .
९. कुलगुरु, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर.
१०. कुलसचिव, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर.
११. नियंत्रक (वित्त व लेखा), महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर.
१२. महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा) /(लेखा अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
१३. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१४. सहयोगी अधिष्ठाता, पशुवैद्यकीय /दुग्धतंत्रज्ञान/ मत्स्य विज्ञान महाविद्यालये, मुंबई / नागपूर/शिरवळ/परभणी/उद्‌गीर/अकोला/वरुड/ नागपूर.
१५. निवड नस्ती.